**यांत्रिकी संघटनेमार्फत केल्या जाणाऱ्या यांत्रिकी कामांसाठी यंत्रसामुग्री पाखरण व संनियंत्रण समिती स्थापन करणेबाबत**

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

## शासन परिपत्रक क्रमांकः सनिस/पाखरण/२०१४ (प्र.क्र.१५६/२०१४)/यांत्रिकी

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक :- २६/०९/२०१४.

### शासन परिपत्रक

यांत्रिकी संघटनेमार्फत केल्या जाणाऱ्या यांत्रिकी कामासाठी विविध प्रकारची अवजड यंत्रसामुग्री उपयोगात आणली जाते. महाराष्ट्रातील भौगोलिक क्षेत्रानुसार प्रत्येक प्रादेशिक क्षेत्रासाठी यांत्रिकी मंडळ कार्यालय कार्यरत आहेत. यांत्रिकी मंडळ कार्यालयाकडे उपलब्ध असलेल्या अवजड यंत्रसामुग्रीनुसार त्या त्या प्रदेशातील स्थापत्य संघटनेने सूचविलेल्या व शासनाने मंजूर केलेल्या पाखरण कार्यक्रमानुसार कामे केली जातात.

अवजड यंत्रसामुग्रीची, मंजूर पाखरण कार्यक्रमानुसार कामे करण्यासाठी एकूण गरज किती, उपलब्ध किती, व त्यानुसार आवश्यक यंत्रसामुग्रीचे पाखरण, यांत्रिकी मंडळनिहाय करणे आवश्यक आहे. यामुळे उपलब्ध यंत्रसामुग्री विनावापर राहणार नाही. याबाबत केंद्रीय जल आयोगाने मार्गदर्शक तत्त्वे निर्गमित केली आहे. मार्गदर्शक तत्वानुसार कलम १.१.१.१ व १.१.१.२ नुसार प्रत्येक राज्याने राज्यस्तरावर यंत्रसामुग्री पाखरण समिती स्थापन करावी, व या समितीने दरवर्षी हंगाम सुरु होण्यापूर्वी सर्व उपलब्ध यंत्रसामुग्रीचा आढावा घ्यावा असे मार्गदर्शक तत्वामध्ये सूचीत केले आहे. यानुसार शासन खालीलप्रमाणे निर्देश देत आहे.

**शासनाचे निर्देश**

राज्यातील यांत्रिकी संघटनेमार्फत केल्या जाणाऱ्या वार्षिक मंजूर पाखरण कार्यक्रमातील कामांचा आढावा घेवून त्याबाबत यांत्रिकी संघटनेकडील उपलब्ध यंत्रसामुग्री व अवजारे यांचे कामाच्या गरजेनुसार संनियंत्रण व पाखरण करण्यासाठी राज्यस्तरावर खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| १) मुख्य अभियंता (द.व प्र.) व सहसचिव | समिती प्रमुख |
| २) मुख्य अभियंता (यांत्रिकी) नाशिक | सदस्य |
| ३) मुख्य अभियंता (जसं) नागपूर | सदस्य |
| ४) मुख्य अभियंता (जसं) पुणे | सदस्य |
| ५) मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक (लाक्षेवि) औरंगाबाद | सदस्य |
| ६) मुख्य अभियंता (जसं) अमरावती | सदस्य |
| ७) मुख्य अभियंता (जसं) जळगाव | सदस्य |
| ८) मुख्य अभियंता (जसं) कोकण | सदस्य |
| ९) अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ नाशिक | सदस्य सचिव |

(१) वरील समिती यांत्रिकी संघटनेमार्फत वार्षिक पाखरण कार्यक्रमास शासनाची मंजूरी मिळाल्यानंतर १५ दिवसांच्या आत (सप्टेंबर अखेरपर्यन्त) मंजूर वार्षिक पाखरण कार्यक्रमानुसार प्रत्येक यांत्रिकी मंडळनिहाय, आवश्यक यंत्रसामुग्री व उपलब्ध यंत्रसामुग्री यांचा सविस्तर आढावा घेईल. उपलब्ध यंत्रसामुग्री व अवजारे यांचे कामाच्या गरजेनुसार यंत्र सामुग्रीचा वार्षिक पाखरण निश्चित करेल. त्यानुसार उपलब्ध यंत्रसामुग्री, यांत्रिकी मंडळनिहाय उपलब्ध करुन देण्यात येईल. यांत्रिकी संघटनेकडील यंत्रसामुग्री व अवजारे विनावापर पडून राहणार नाहीत, याबाबतचा सविस्तर आढावा समिती मार्फत घेण्यात येईल. याबाबत समिती दर चार महिन्यांनी बैठक घेवून आढावा घेईल.

(२) यांत्रिकी संघटनेच्या बदलत्या कामानुसार यांत्रिकी संघटनेकडे कार्यरत असलेल्या सर्व साधन सामुग्री, यंत्रसामुग्री व कर्मशाळा यांचा वेळोवेळी आढावा घेवून यांत्रिकी संघटना कार्यक्षम होण्यासाठी बदलत्या काळानुसार आवश्यक असलेला बदल उदा. दापोडी कर्मशाळा व प्रादेशिक कर्मशाळा इत्यादींचे बाहय अभिकरणांची मदत न घेता स्वबळावर सर्व द्वारनिर्मिती, उभारणी व दुरुस्तीची कामे करु शकेल, यासाठी आवश्यक सुधारणा, नुतनीकरण व बळकटीकरणासाठी शासनास शिफारस करेल.

वरील प्रमाणे व शासनामार्फत वेळोवेळी दिलेल्या निर्देशाच्या प्रमाणे समिती काम करेल.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१४०९२६१२११४२५२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Ram Baswantrao Ghote

Digitally signed by Ram Baswantrao Ghote
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ram Baswantrao Ghote
Date: 2014.09.26 12:22:54 +05'30'

**( रा. ब. घोटे )**
मुख्य अभियंता (द व प्र) व सहसचिव

**प्रति,**

१) स्विय सहायक, प्रधान सचिव(जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२) स्विय सहायक, प्रधान सचिव(लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
३) कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
४) कार्यकारी संचालक, गोदावरी व मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद

५) कार्यकारी संचालक, कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पूणे
६) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
७) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव
८) स्विय सहायक, सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
९) स्विय सहायक, सर्व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) मुख्य अभियंता (यां), जलसंपदा विभाग, नाशिक
११) सर्व मुख्य अभियंता (स्थापत्य), जलसंपदा विभाग
१२) स्विय सहायक, सर्व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) सर्व अवर सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) सर्व अधीक्षक अभियंता (स्थापत्य व यांत्रिकी), जलसंपदा विभाग
१५) सर्व कार्यकारी अभियंता (स्थापत्य व यांत्रिकी), जलसंपदा विभाग
१६) यांत्रिकी कार्यासन संग्रहार्थ